वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ (भाग दुसरा)
जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांना वित्तीय
अधिकार प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००३/१२/प्र.क्र.६०४/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १५ एप्रिल, २००४.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमटीसी २००३/१२/प्र.क्र.६०४/पर्यटन,
दिनांक ९ जानेवारी २००४.

**शासन निर्णय:-** जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांना पर्यटन विकासासाठी करावयाच्या किरकोळ नागरी बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्यास परवानगी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

वित्तीय अधिकार प्रदान समितीच्या शिफारशीवरुन विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये दर्शविल्याप्रमाणे आणि त्यात दर्शविलेल्या विहीत अटींच्या आणि शर्तींच्या तसेच वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून वित्तीय अधिकार (भाग-दुसरा) अन्वये प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे. या निर्णयाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय बाबींचा वापर हा विविध वित्तीय प्रकाशनामध्ये अंतर्भूत असलेले नियम आणि विनियम यामधील अटींच्या व शर्तींच्या अधीन तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कार्यकारी अनुपालनाच्या अधीन, त्याचप्रमाणे खालील अटींच्या अधीन राहून करण्यात यावा.

२. प्रदत्त शक्तीचा वापर करुन दिल्या जाणा-या मंजूरीबाबतचा प्रत्येक आदेश संबंधित सक्षम अधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करावा. प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीच्या संदर्भात संबंधित प्रभारी शासन सचिव हे सक्षम अधिकारी आहेत. संबंधित सक्षम अधिका-यांच्या मान्यतेने आदेश निर्गमित केले आहेत असा स्पष्ट उल्लेख प्रत्येक मंजूरी आदेशात करण्यात यावा.

३. या वित्तीय अधिकारांचा वापर करुन मंजूरी आदेश निर्गमित करताना विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी मंजूरी आदेशांची प्रत, इतर सर्व संबंधित अधिका-यांप्रमाणेच, संबंधित लेखा परीक्षा अधिकारी व वित्त विभाग (वित्त विभाग (विनियम व संबंधित व्यय कार्यासन)२ प्रती) यांना पाठवावी व अशा मंजूरी आदेशांमध्ये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८,भाग- दुसरा मधील संबंधित वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक /शासन निर्णयाचा क्रमांक, दिनांक व त्यासोबतच्या परिशिष्टांतील वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक यांचा न चुकता स्पष्ट उल्लेख करावा.

४. वित्तीय प्रकाशन क्र.७(वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९६४) मध्ये अंतर्भूत नसलेल्या बाबींच्या व विषयांच्या संदर्भात शासनाला कनिष्ठ असलेल्या प्राधिका-यांना सध्या प्रदान करण्यात आलेल्या किंवा ते यापूर्वी वापर करीत असलेल्या वित्तीय शक्तींवर व शासन निर्णयांतील वित्तीय अधिकार प्रदानामुळे कोणताही परिणाम होणार नाही किंवा बाधा येणार नाही. सक्षम प्राधिका-याला प्रदान करण्यात आलेल्या सध्याच्या वित्तीय शक्ती वित्तीय मर्यादेच्या संदर्भात किंवा इतर अटींच्या किंवा शर्तीच्या संदर्भात या शासन निर्णयाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीपेक्षा अधिक व्यापक असतील तर सध्याच्या अशा शक्तींचा वापर त्यांना यापुढेही चालू ठेवता येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र.य.नलावडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,
ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,
निवड नस्ती.

(शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक एमटीसी २००३/१२/प्र.क्र.६०४/पर्यटन, दिनांक      एप्रिल २००४ चे परिशिष्ट)

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग दुसरा खाली गृह विभागाच्या नियंत्रणाखालील विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार.

| अनु. क्र. | नियम क्रमांक | वित्तीय शक्तींचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८-भाग-पहिला उप विभाग पाच, अ.क्र.३ परि-१३४. | पर्यटन विकासासाठी करावयाच्या किरकोळ नागरी बांधकामांना प्रशासकीय मान्यता देणे. | जिल्हाधिकारी,<br>विभागीय आयुक्त | रु. १०,००,०००/-<br>रु. २५,००,०००/- | खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. |